**सन १९७५-७७ मधील आणीबाणीच्या कालावधीत लोकशाहीकरीता लढा देणा-या ज्या व्यक्तींना बंदिवास सोसावा लागला अशा व्यक्तींचा सन्मान/ यथोचित गौरव करण्यासंबंधी धोरणात बदल.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - निवृवे १०१५/प्र.क्र. २६१/२०१५(२०१८)/स्वासैक-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक - ३१ जुलै, २०२०.

**वाचा :**- १) शासन निर्णय क्र. निवृवे १०१५ / प्र.क्र. २६१/२०१५(२०१८)/स्वासैक-१ दि. १४.०२.२०१८
२) शासन निर्णय क्र. निवृवे १०१५ / प्र.क्र. २६१/२०१५(२०१८)/स्वासैक-१ दि. ०३.०७.२०१८

**प्रस्तावना :-**

मार्च २०२० पासून महाराष्ट्रात कोविड-१९ या संसर्गजन्य रोगाचा प्रादुर्भाव झाल्याचे निर्दशनास आले असून कोरोनाग्रस्त बाधित रुग्णांच्या संख्येत वाढ होत आहे. यामुळे या महामारीवरील प्रतिबंधात्मक उपाययोजना म्हणून संपूर्ण देशात दि. २४.३.२०२० पासून लॉकडाऊन जाहीर करण्यात आलेला आहे. लॉकडाऊनद्वारे अनेक निर्बंध घालण्यात आले आहेत. सदर निर्बंधांमुळे राज्याच्या कर व करेतर महसुलात घट होवून राज्याच्या अर्थव्यवस्थेवर विपरीत परिणाम झाला आहे. यावर प्रभावी उपाययोजना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने दि.०२/०६/२०२० रोजी मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयानुसार खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

कोविड-१९ या संसर्गजन्य रोगाचा प्रादुर्भावामुळे सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात राज्याची कर व करेतर उत्पन्नातील अपेक्षित महसूली घट व त्याचे राज्याच्या अर्थव्यवस्थेवर होणारे परिणाम विचारात घेवून “सन १९७५-७७ या आणीबाणीच्या कालावधीत लोकशाहीकरिता लढा देणाऱ्या व्यक्तींचा सन्मान/ यथोचित गौरव करण्यासंबंधी धोरण (प्रधान लेखाशीर्ष ए-५, २२३५ सी २०५)” या कार्यक्रमाची अंमलबजावणी बंद करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. सदर कार्यक्रमातील प्रलंबित दायीत्वाचे निराकरण या विभागाच्या मंजूर अर्थसंकल्प तरतुदीतून करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००७३१११३८५१८२०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Suresh Mahadeo Khade

Digitally signed by Suresh Mahadeo Khade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=14c299447f4a6e6c33ab3f7a85fbf010628981e82f8311a81d1cf974681485c2, serialNumber=f0b4c833a6fc7c6fb7cb0a96a3e2bb79d42d283b8f0f7bfc1ae95298d60bacf1, cn=Suresh Mahadeo Khade
Date: 2020.07.31 14:51:40 +05'30'

**(सु.म.खाडे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. अध्यक्ष, विधानसभा, विधिमंडळ, मुंबई
४. मा. उपाध्यक्ष, विधानसभा, विधिमंडळ, मुंबई
५. मा. सभापती, विधानपरिषद, विधिमंडळ, मुंबई
६. मा. उपसभापती, विधानपरिषद, विधिमंडळ, मुंबई
७. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
८. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई
९. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
११. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
१२. प्रधान सचिव व वि.चौ.अ.-१, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. उप सचिव, (स्वा.सै.क.), सा.प्र.वि.मंत्रालय, मुंबई
१४. सर्व विभागीय आयुक्त
१५. सर्व जिल्हाधिकारी
१६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
**१८**. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
**१९**. सा.प्र.वि., कार्या.२५, मंत्रालय, मुंबई
**२०**. क.अ.वित्त विभाग (अर्थ-१३/व्यय-४), मंत्रालय, मुंबई
**२१**. निवडनस्ती, ( स्वा.सै.क.१).